**उच्च व तंत्रशिक्षण विभागांतर्गत येणाऱ्या शैक्षणिक संस्थांमध्ये महाराष्ट्र राज्य माहिती तंत्रज्ञान प्रमाणपत्र हा अभ्यासक्रम सुरू करण्याबाबत**

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्र.मातंत्र ३७००/(१३२/२०००)/तांशि-३
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक : ३ ऑक्टोबर, २०००.

संदर्भ:- शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.एससीटी १६००/ (१२२/२०००)/तांशि-४, दि.६ सप्टेंबर,२०००.

प्रस्तावना:- जगभरात माहिती तंत्रज्ञान या विषयांत क्रांती सुरू झाली असून सदर विषय जीवनाच्या सर्व क्षेत्रांमध्ये परिणाम करित आहे. विशेषतः आर्थिक व व्यापारी क्षेत्रामध्ये त्याचे परिणाम जबरदस्त व जलद गतीने होत असून, आजच्या पेक्षा उद्याचा समाज या बदलांमुळे सर्वस्वी भित असणार आहे. तसेच या परिणामांमुळे आजच्या प्रणाली बदलणार आहेत. या होऊ घातलेल्या बदलास योग्य अशी मानसिकता उद्याच्या नागरिकांमध्ये निर्माण होऊन त्याच्या जोडीला माहिती तंत्रज्ञान या विषयाचे ज्ञान व कौशल्य विद्यार्थ्यांमध्ये असणे अत्यंत आवश्यक आहे. सध्या महाराष्ट्र राज्यातील काही अभियांत्रिकी महाविद्यालये, तंत्रनिकेतने माहिती तंत्रज्ञान अभ्यासक्रमांतर्गत पदवी व पदविका शिक्षण देत आहेत. शहरी भागात काही विद्यार्थी भरमसाठ फी देऊन माहिती तंत्रज्ञानाच्या अभ्यासक्रमास प्रवेश घेतात. तथापि, बहुतांश विद्यार्थी माहिती तंत्रज्ञान या विषयाबाबत अद्यापही अनभिज्ञ आहेत. उच्च व तंत्रशिक्षण विभागांतर्गत १०लाख विद्यार्थी व ५०हजार प्राध्यापक व निदेशक यांना माहिती तंत्रज्ञान विषयक शिक्षण देऊन संगणकीय जाळयाद्वारे आय.टी. एनेबल्ड शिक्षण देण्यासाठी प्रथमतः खाजगी ट्रेनिंग प्रोव्हायडर एजन्सीज व नंतर शासन पुरस्कृत नवनिर्मित कंपनीद्वारे उपक्रम राबविण्याचा महाराष्ट्र शासनाचा विचार आहे. तसेच यानंतर दुसऱ्या टप्प्यात आय.टी. एनेबल्ड शिक्षण देण्याचे शासनाचे उद्दिष्ट आहे.

शासन निर्णय:-

वरील उपक्रमाच्या अंमलबजावणीचा पहिला टप्पा म्हणून राज्यातील सर्व महाविद्यालये तंत्रनिकेतने, औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये शासनाद्वारे तयार करण्यात येणाऱ्या निवडसूचीतील

खाजगी टी.पी.ए.मार्फत विद्यार्थ्यांकरिता Maharashtra State Certificate Course In Information Technology (एम.एस.सी.आय.टी.) व शिक्षकांकरिता Maharashtra State Advanced Certificate Course In Information Technology (एम.एस.ए.सी.आय.टी.) हा प्रत्येकी किमान १४४ तासांचा माहिती तंत्रज्ञान विषयक अभ्यासक्रम नेहमीच्या विहित शैक्षणिक अभ्यासक्रमाव्यतिरिक्त वेगळा व स्वतंत्ररित्या सुरू करण्यास मान्यता देण्यात येत आहे. हा अभ्यासक्रम शैक्षणिक संस्थेत प्रवेश घेणारे विद्यार्थी व संस्थेतील शिक्षक यांना ऐच्छिक असेल.

सदरचे शिक्षण प्रशिक्षण घेण्याकरिता प्रत्येक प्रशिक्षणार्थीला खालील कोष्टकात नमूद केल्याप्रमाणे त्या त्या संस्थेतील सर्व वर्गाची मिळून हजेरी पटावरील विद्यार्थ्यांची व संस्थेतील शिक्षकांची एकूण संख्या विचारात घेऊन किमान रू.१२००/- ते जास्तीत जास्त रू.२०००/- एवढे शिक्षण शुल्क त्यांच्या नेहमीच्या शिक्षण शुल्कापेक्षा वेगळे द्यावे लागेल.

| संस्थेतील सर्व वर्गाच्या हजेरी पटावरील एकूण विद्यार्थ्यांची व शिक्षकांची संख्या | प्रती प्रशिक्षणार्थी (विद्यार्थी व शिक्षक) आकारण्यात येणारे शुल्क (रू.) |
|---|---|
| ६० पेक्षा कमी | जास्तीत जास्त रू.२००० |
| ६०-११९ | रू.१९०० |
| १२०-१७९ | रू.१८०० |
| १८०-२३९ | रू.१७०० |
| २४०-२९९ | रू.१६०० |
| ३००-३५९ | रू.१५०० |
| ३६०-४१९ | रू.१४०० |
| ४२०-४७९ | रू.१३०० |
| ४८० किंवा त्यापेक्षा अधिक | रू.१२०० |

तसेच शिक्षकांकडून एम.एस.ए.सी.आय.टी. या अभ्यासक्रमासाठी रू.३३०० इतके शुल्क आकारण्यात यावे.

अशा प्रकारे प्रशिक्षणार्थ्यांकडून आकारण्यात येणारे शुल्क, शिक्षण प्रशिक्षण अभ्यासक्रमास प्रवेश मिळण्यापूर्वी बॅन्केत ट्रेनिंग प्रोव्हायडरने सदर कार्यक्रमाच्या अनुषंगाने उघडलेल्या स्वतंत्र खात्यामध्ये जमा करावे. या शिक्षण शुल्कात मागासवर्गीय, आर्थिकदृष्टया दुर्बल, प्राथमिक व माध्यमिक शिक्षकांची मुले किंवा अन्य कोणत्याही प्रकारच्या शिक्षण शुल्क

सवलती मिळणाऱ्या विद्यार्थ्यांना व शिक्षकांना शिक्षण शुल्कात सवलत मिळणार नाही. तथापि, आवश्यकता असल्यास संस्थेतील आर्थिकदृष्टया मागास व गरजू विद्यार्थ्यांकरिता बॅन्क, स्वयंसेवी संस्था, संस्थेचे माजी विद्यार्थी इ.च्या मार्फत सावित्रीबाई फुले दत्तक योजनेच्या धर्तीवर संस्था स्तरावर निधी उभा करून त्यातून सदरच्या विद्यार्थ्यांना अभ्यासक्रमाचे शिक्षण प्रशिक्षण घेण्यासाठी कर्ज

स्वरूपात रक्कम उपलब्ध करून देण्याचे अधिकार संबंधित प्राचार्यांना सदरच्या आदेशान्वये देण्यात येत आहेत. यासाठी त्यांनी उभारलेला निधी शासकीय शैक्षणिक संस्था व अन्य शैक्षणिक संस्थांनी राष्ट्रीयकृत बॅन्केत स्वतंत्र खाते उघडून जमा करावे व सदर जमा झालेल्या रकमेतून किंवा त्यावरील व्याजातून विद्यार्थ्यांना हे शिक्षण प्रशिक्षण घेण्यासाठी राष्ट्रीयकृत बॅन्केच्या व्याज दराने कर्ज द्यावे.

ट्रेनिंग प्रोव्हायडर एजन्सी अभ्यासक्रम शिकवित असताना त्या कालावधीत ३ चाचणी परीक्षा घेईल व तसेच अभ्यासक्रम पूर्ण झाल्यानंतर या विद्यार्थ्यांची परीक्षा महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाने On-line पध्दतीने घ्यावी. त्याकरिता यावर्षी रू.२०० (जास्तीत जास्त) इतके परीक्षा शुल्क आकारण्यास महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळास परवानगी देण्यात येत आहे. सदरचे शुल्क प्रतिवर्षी जास्तीत जास्त ५टक्क्यांनी वाढविण्यास मंडळास मुभा राहील. हा अभ्यासक्रम पूर्ण करून परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना एक प्रमाणपत्र दिले जाईल ज्यावर ट्रेनिंग प्रोव्हायडर एजन्सी व महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाची मानचिन्हे व सक्षम अधिकाऱ्यांच्या स्वाक्षऱ्या असाव्यात.

सदरचे शिक्षण-प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी ट्रेनिंग प्रोव्हायडर एजन्सीची निवडसूची तयार करण्यासाठी ज्या एजन्सीजच्या देशभरात कमीत कमी १०० शाखा/ Franchisee Centres आहेत तसेच मागील ३ वर्षात दरवर्षी सरासरी ५ कोटीचा व्यवहार/उलाढाल आहे, अशा एजन्सीजकडून दि.४.९.२००० च्या जाहिरातीद्वारे देकार मागविण्यात आले आहेत.

सदर देकार संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य यांचेकडे भरताना संबंधित एजन्सीजकडून डी.डी.च्या स्वरूपात मिळणारी रू.१०लाख इतकी अनामत रक्कम जमा करण्यासाठी संचालक, तंत्रशिक्षण व सहसंचालक, तंत्रशिक्षण, मुख्यालय, मुंबई यांना स्टेट बॅन्क ऑफ इंडिया, मुंबई या बॅन्केत स्वतंत्रपणे संयुक्त खाते उघडून सदर रक्कम अल्पावधी मुदत ठेव योजनेत गुंतवून त्यापोटी जमा होणाऱ्या व्याजाच्या रकमेतून जाहिरात व माहिती तंत्रज्ञानाशी

अनुषंगिक बाबीवरील खर्च भागविण्यासाठी शासन मान्यता दिली आहे. तथापि, याबाबतची सर्वस्वी जबाबदारी संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील.

राज्यातील शासकीय अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालये व अभियांत्रिकी तंत्रनिकेतने यांना अभिमत (Deemed) ट्रेनिंग प्रोव्हायडर म्हणून दर्जा सदरच्या आदेशान्वये देण्यात येत आहे. या वर्षी प्रथमतः खालील १० संस्थांना अभिमत ट्रेनिंग प्रोव्हायडर म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

१. शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे
२. शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड
३. शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती,
४. शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, औरंगाबाद
५. शासकीय तंत्रनिकेतन, मुंबई
६. शासकीय तंत्रनिकेतन, पुणे
७. शासकीय तंत्रनिकेतन, नाशिक
८. शासकीय तंत्रनिकेतन, औरंगाबाद
९. शासकीय तंत्रनिकेतन, नागपूर
१०.शासकीय तंत्रनिकेतन, अमरावती.

या संस्थांना देकार भरण्याची आश्यकता असणार नाही. मात्र ट्रेनिंग प्रोव्हायडरसाठीच्या अन्य अटी या संस्थांनाही लागू राहतील. ज्या संस्थांना ट्रेनिंग प्रोव्हायडरचा अभिमत दर्जा दिलेला आहे त्या संस्थांनी अनामत ठेवीसाठी भरावयाचे रू.१० लाख इतकी रक्कम या संस्था त्यांना ट्रेनिंग प्रोव्हायडर म्हणून प्राप्त होणाऱ्या उत्पतातून रू.३ लाख, रू.३ लाख व रू.४ लाख अशा ३ वार्षिक हप्त्यात भरतील.

शासनाकडून विहित प्रक्रियेद्वारे निश्चित करण्यात येणाऱ्या ट्रेनिग प्रोव्हायडरची निवडसूची पुढील ३ वर्षासाठी ग्राहय धरण्यात येईल. मात्र त्यासाठी दर ११ महिन्यानंतर ट्रेनिंग प्रोव्हायडरची शैक्षणिक व इतर संख्यात्मक व गुणात्मक बाबींचे विद्यार्थ्यांची मते व संस्थेच्या प्राचार्यांनी केलेले मूल्यमापनानंतर संबंधित संचालकांकडून समाधानकारक कार्यक्षमता असणाऱ्या ट्रेनिंग प्रोव्हायडरला पुढील ११ महिन्यांची मुदतवाढ देण्यात येईल. सदरच्या मुदतवाढीबाबतचा निर्णय संबंधित संचालकांनी वरील मूल्यमापनाच्या आधारे १५ दिवसांच्या आत घेऊन त्याप्रमाणे ट्रेनिंग प्रोव्हायडरला कळवावे. मात्र अशा प्रकारे दिलेली एकूण मुदतवाढ जास्तीत जास्त ३ वर्षे असेल.

संबंधित शैक्षणिक संस्था, ट्रेनिंग प्रोव्हायडर व संबंधित संचालनालय किंवा संचालनालयाचे अधिकृत प्रतिनिधी यांच्यामध्ये शासनाकडून विहित करण्यात येणाऱ्या नमुन्यामध्ये त्रिपक्षीय करार करण्यात यावा. सदरच्या त्रिपक्षीय करारनाम्याचा मसूदा सर्व शासकीय संस्था व संचालकांना शासनाकडून देण्यात येईल. शासनाने तयार केलेल्या ट्रेनिंग प्रोव्हायडरची निवडसूची जाहीर केल्यानंतर ४५ दिवसांच्या आत एका ट्रेनिंग प्रोव्हाडरची निवड करण्याचे अधिकार संस्थेच्या प्राचार्यांना देण्यात येत आहेत.

ट्रेनिंग प्रोव्हायडरने सदर कार्यक्रमाकरिता उघडलेल्या बॅन्क खात्यामध्ये प्रशिक्षणार्थिंनी या अभ्यासक्रमासाठी शिक्षण शुल्कापोटी जमा केलेल्या रकमेपैकी संबंधित संस्थेला व संचालनालयाला वर्ग करावयाची असलेली प्रत्येकी २०टक्के व १०टक्के इतकी रक्कम संबंधित शैक्षणिक संस्थेच्या व संचालनालयाच्या खात्यामध्ये ट्रेनिंग प्रोव्हायडर परस्पर बॅन्केमार्फत जमा करावी. त्यासाठी संबंधित ट्रेनिंग प्रोव्हायडरने बॅन्कांना तशा प्रकारे मॅनडेट व आवश्यक त्या सूचना देऊन त्याबाबतची माहिती संबंधित संस्थेस देणे बंधनकारक राहील. सदरची रक्कम वेळोवेळी संस्थेच्या व संचालनालयाच्या

खात्यात जमा झाली असल्याची खात्री संस्थेचे प्राचार्य करतील व त्याची सर्वस्वी जबाबदारी त्यांची असेल. तसेच बॅन्क खात्यात राज्य शासनाचा कोणताही निधी वर्ग केला जाणार नाही.

सदर रक्कम शासकीय संस्था व अन्य संस्था त्यांच्या स्वतंत्र बॅन्क खात्यामध्ये ठेऊन या रकमेचा विनियोग सदर अभ्यासक्रम राबविण्यासाठी येणारा खर्च, तसेच महाविद्यालयाचे विकास कार्यासाठी करावा.

ट्रेनिंग प्रोव्हायडर एजन्सीला संबंधित शैक्षणिक संस्थेमार्फत सदर प्रशिक्षणासाठी वर्ग व प्रात्यक्षिक प्रयोगशाळांसाठी योग्य मोफत जागा; नवीन वीज व इंटरनेटसाठी दूरध्वनी कनेक्शनची सुविधा उपलब्ध करून देण्यासाठीचा खर्च शैक्षणिक संस्थांनी करावा. मात्र अन्य पायाभूत सुविधा म्हणजे योग्य असे फर्निचर व आवश्यक असल्यास वातानुकूल यंत्रणा आणि योग्य प्रमाणात संगणकीय व प्रशिक्षणासाठी अन्य आवश्यक असणारी यंत्रणा, साधन सामुग्री (प्रपत्र-अ) प्रमाणे व शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या मानकांप्रमाणे ट्रेनिंग प्रोव्हायडरने स्वखर्चाने उपलब्ध करून घ्यावे. तसेच वीज, दूरध्वनी, इंटरनेट पाणी-पुरवठा, सुरक्षा इ.बाबत होणारा आवर्ती खर्चही संबंधित ट्रेनिंग प्रोव्हायडरनी करावे.

ज्या शासकीय शैक्षणिक संस्था सध्या किरायाच्या जागेत कार्यरत आहेत त्या संस्थांना आवश्यकता असल्यास ट्रेनिंग प्रोव्हायडर एजन्सीकरिता किरायाची जागा आवश्यकतेनुसार नियमाप्रमाणे योग्य त्या किरायाने घेण्याचे अधिकार व त्या किरायाच्या जागेचा किराया संस्थेस

ट्रेनिंग प्रोव्हायडर एजन्सीकडून प्राप्त होणाऱ्या २०टक्के रकमेतून भागविण्याचे अधिकार संबंधित संस्थेच्या प्राचार्यांना देण्यात येत आहेत.

तसेच आवश्यक असल्यास सुरक्षिततेसाठी कंत्राटी पध्दतीने, निश्चित कालावधीसाठी, तात्पुरत्या स्वरूपात सुरक्षा रक्षक नेमण्याचे व त्यासाठी येणारा खर्च संस्थेस प्राप्त होणाऱ्या २०टक्के रकमेतून भागविण्याचे अधिकारही संस्थेच्या प्राचार्यांना देण्यात येत आहेत.

सर्वसाधारणपणे विद्यार्थी संख्येच्या उपलब्धतेनुसार सकाळी ८ ते सायंकाळी ८ या कालावधीत वरील सर्व उपलब्ध सोयी-सुविधांचा संस्थेच्या विद्यार्थ्यांकरिता सदरचे शिक्षण प्रशिक्षण घेण्यासाठी व भविष्यात आय.टी. एनेबल्ड शिक्षणासाठी वापर करण्यात यावा. प्रत्येक संस्थेत एजन्सीने उभ्या केलेल्या अशा सोयी-सुविधांना Network Access Centre (N.A.C.) असे संबोधण्यात येईल व या N.A.C.चा प्रशिक्षणार्थ्यांना देण्यात येणाऱ्या शिक्षण प्रशिक्षणाव्यतिरिक्त उर्वरित २८ आठवडयाच्या कालावधीत पूर्ण वेळ व्यावसायिक उपयोग करण्यासाठी एजन्सीला परवानगी देण्यात येत आहे.

अभिमत दर्जा दिलेल्या संस्थांना (महाविद्यालये व तंत्रनिकेतने) त्रिपक्षीय करार करणे, ७०टक्के शुल्क ठेऊन घेणे, आणि त्यांना ट्रेनिंग प्रोव्हायडर एजन्सी म्हणून येणारा आवर्ती खर्च करण्याचे, तसेच आवश्यकतेनुसार खाजगी कंपन्यांशी करार करून Franchise म्हणून त्यांची नियुक्ती करण्याचे अधिकार संबंधित प्राचार्यांना देण्यात येत आहे.

संस्था व संचालनालय यांचेकडे वरीलप्रमाणे जमा झालेली रक्कम राष्ट्रीयकृत बॅन्केत याकरिता स्वतंत्र खाते उघडून त्यामध्ये ठेवण्याचे अधिकार व त्याची जबाबदारी संबंधित संचालक व संस्थेच्या प्राचार्यांची राहील.

वरील सर्व कार्यक्रम हा यावर्षी पहिला टप्पा म्हणून या विभागांतर्गत फक्त शासकीय संस्थांमधील विद्यार्थ्यांसाठी व शिक्षकांसाठी हा अभ्यासक्रम राबविण्यात यावा व पुढील शैक्षणिक वर्षाच्या सुरूवातीपासून शासकीय अनुदानित व विना अनुदानित संस्थांमधून व्याप्ती वाढवावी. एखाद्या संस्थेत पुरेसे विद्यार्थी उपलब्ध न झाल्यास दोन किंवा अधिक शैक्षणिक संस्थांसाठी एकत्र शिक्षण-प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यास परवानगी देण्यात येत आहे.

सदरचा कार्यक्रम यावर्षी ज्या अनुदानित व विना अनुदानित संस्थांना ही अभ्यासक्रम सुरू करावयाचा असेल त्यांना शासनाद्वारे निश्चित करण्यात येणाऱ्या निवडसूचीतील ट्रेनिंग प्रोव्हायडरची नियुक्ती करण्यास व वर नमूद केलेल्या सर्व अटी, शर्तीस अनुसरून अंमलबजावणी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

तथापि, वर नमूद केल्याप्रमाणे सदरचा कार्यक्रम राबविण्यासाठी संबंधित संचालक व संस्थेच्या प्राचार्यांना जे आर्थिक व प्रशासकीय अधिकार दिले आहेत त्याची अंमलबजावणी अत्यंत काटेकोरपणे करणे आवश्यक आहे याची सर्वस्वी जबाबदारी सबंधित संचालक व संस्थेच्या प्राचार्यांची राहील.

सदरचे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४७९/२०००, दि.२८.९.२००० अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( कुमुद बन्सल )

प्रधान सचिव,
उच्च व तंत्रशिक्षण विभाग.

प्रति,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.उपमुख्यमंत्र्याचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
कुलगुरू, सर्व विद्यापीठे,
संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, उद्योगधंदे संस्था समन्वय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
शिक्षण संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, व्यवसाय शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
कला संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, वांद्रे (पू.), मुंबई.
सर्व सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालये.
सर्व सहसंचालक, उच्च शिक्षण, विभागीय कार्यालये.
सर्व उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, विभागीय कार्यालये.
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
सर्व प्राचार्य शासकीय महाविद्यालये/तंत्रनिकेतने/औद्योगिक प्रशिक्षण संस्था (संबंधित संचालकांमार्फत)
प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

प्रधान सचिव(लेखा व कोषागार), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव(व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, वैद्यकीय शिक्षण, मंत्रालय, मुंबई.
सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, पशुसंवर्धन, दुग्धविकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
विकास आयुक्त, उद्योग संचालनालय,
उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव.
उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व कार्यासने.
मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव.
मा.प्रधान सचिव (उच्च व तंत्रशिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक.
मा.प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व कार्यासने.
निवडधारिका/तांशि-३.

<u>प्रपत्र</u>

## COMPUTING FACILITIES

Students will be given computing facilities during the course on a dedicated client node to be shared by a pair of students.

१. Servers

२. Server with Back Office Ver. ४.५

३. Configuration

४. Pentium III @ ६५० MHz; १२८MB ECC RAM; ८*३GB Fast Wide SCSI-II Hard Disk Drive; SVGA Color Monitor (१५ड); PCI-DVGA Card with २ MB VRAM; PCI Network Card १०/१०० Base T UTP Ethernet, ५ CD Juke Box, १.४४MB FDD. DVD Drive, ३२X CD-Rewriter with SCSI Interface, ४/८ GB DAT Drive with SCSI Interface, Microsoft PS/२ Mouse, २ Serial ports, ११० keys Keyboard, ६४ kbps ISDN modern; ४०० Watts SMPS; Tower cabinet with additional cooling facility

५. Clients Machines/Network Nodes

६. Configuration

७. Pentium III @ ४५० MHz; ६४ MB SDRAM;

8. GB Hard Disk Drive IDE/EIDE; SVGA Color Monitor (15”) Digital Non-Interlaced FST; AGP-VGA Card with 8 MB VRAM; Network Card 10/100 Base T PCI Ethernet; 52X

९. CD Drive; Sound Blaster card; MS PS/२ Mouse; ११० Keys Keyboard; २६० Watt SMPS.

१०. Network

११. Network १०/१०० Base T UTP Hub २४ Port

१२. UTP E-CAT-५ cabling with RJ-४५ connectors

१३. UTP Patch cables.

१४. Communications and Internet

१५. VSNLZs Gateway Internet Access Service

१६. ISDN Connectivity through MTNL or DOT with atleast ६४ kbps bandwidth

१७. A Telephone line through the local DOT

१८. Printers

१९. Dot Matix Printer ॐ १३२ Column

२०. Laserjet Printer

२१. Operating Systems & Application Software

२२. Windows Back Office ४.५ server

२३. Windows NT Workstation ४.०/Windows ९५/९८

२४. ISM Office for Indian Language Interface

२५. Microsoft Office २००० Professional Edition

२६. Anti Virus software for nodes/Server

Note: This Specifications are based on the present day requirements. Changes/upgradation in the technology requirements will have to be effected from time to time as per the direction of the department of Higher & Technical Education.

**उच्च व तंत्रशिक्षण विभागांतर्गत येणाऱ्या शैक्षणिक संस्थांमध्ये खाजगी ट्रेनिंग प्रोव्हायडर मार्फत महाराष्ट्र राज्य माहिती तंत्रज्ञान प्रमाणपत्र व प्रगत प्रमाणपत्र हा अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी खाजगी ट्रेनिंग प्रोव्हायडरची निवडसूची तयार करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्र.मातंत्र ३७००/(१३२/२०००)/तांशि-३
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक : १३ ऑक्टोबर,२०००

संदर्भ:- १) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.मातंत्र ३७००/(१३२/२०००)/तांशि-३, दि.३ ऑक्टोबर,२०००.

२) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र.११/तंशिसं/माहिती तंत्रज्ञान/२०००/२३०८, दि.१०.१०.२००० चे पत्र.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्यातील उच्च व तंत्रशिक्षण विभागांतर्गत येणाऱ्या शैक्षणिक संस्थांमध्ये वरील संदर्भाधीन शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य माहिती तंत्रज्ञान प्रमाणपत्र व प्रगत प्रमाणपत्र अभ्यासक्रम खाजगी ट्रेनिंग प्रोव्हायडरमार्फत सुरू करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्या अनुषंगाने राज्यातील प्रमुख वृत्तपत्रांमध्ये दि.४.९.२००० रोजी जाहिरात प्रसिध्द करून इच्छुक ट्रेनिंग प्रोव्हायडरकडून शासनाने रितसर देकार मागविले होते. शासनाकडे रितसरपणे देकार सादर करणाऱ्या इच्छुक ट्रेनिंग प्रोव्हायडरपैकी योग्य व पात्र ठरणाऱ्या ट्रेनिंग प्रोव्हायडरची निवडसूची तयार करण्याकरिता या विभागांतर्गत संचालक, तंत्रशिक्षण यांच्या अध्यक्षतेखाली ६ सदस्यीय विशेष समिती गठीत करण्यात आली होती. सदरच्या समितीने शासनाकडे शिफारस केल्याप्रमाणे उपरोक्त कार्यक्रम राबविण्यासाठी खाजगी ट्रेनिंग प्रोव्हायडरची निवडसूची तयार करण्याचा शासनाचा विचार होता.

**शासन निर्णय:-**

शासन आता असा आदेश देत आहे की, उच्च व तंत्रशिक्षण विभागांतर्गत येणऱ्या शैक्षणिक संस्थांमध्ये खाजगी ट्रेनिंग प्रोव्हायडर मार्फत महाराष्ट्र राज्य माहिती तंत्रज्ञान प्रमाणपत्र व प्रगत प्रमाणपत्र हा अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्या विविध अटी, शर्तींच्या अधीन राहून खालील खाजगी ट्रेनिंग प्रोव्हायडरची निवड करण्यात येत आहे:-

१) C-DAC Pune

२) CMC Ltd.Mumbai

३) Zee Interactive Learning Systems Ltd. Mumbai.

४) MCED Aurangabad.

५) YCMOU Nashik

६) Pentasoft Technologies Ltd. Mumbai.

७) MIAECT Pvt. Ltd. Mumbai.

८) Aptech Ltd. Mumbai.

सदरहू आदेशान्वये निश्चित करण्यात आलेल्या ट्रेनिंग प्रोव्हायडरना निवडसूची पुढील तीन वर्षासाठी ग्राहय धरण्यात येईल.

मात्र त्यासाठी दर ११ महिन्यानंतर सदरच्या ट्रेनिंग प्रोव्हायडरची शैक्षणिक व इतर संख्यात्मक व गुणात्मक बाबींचे विद्यार्थ्यांची मते अजमावून व प्राचार्यांनी केलेल्या मूल्यमापनाच्या आधारे या विभागांतर्गत येणाऱ्या संबंधित संचालकांकडून मुदतवाढ मिळवावी लागेल व अशा प्रकारे मिळालेली एकूण मुदतवाढ ही जास्तीत जास्त ३ वर्षे असेल.

सदरचा अभ्यासक्रम शैक्षणिक संस्थेत सुरू करण्यापूर्वी संबंधित शैक्षणिक संस्था, ट्रेनिंग प्रोव्हायडर व संबंधित संचालनालय किंवा संचालनालयाचे अधिकृत प्रतिनिधी यांच्यामध्ये शासनाकडून विहित करण्यात येणाऱ्या नमुन्यामध्ये त्रिपक्षीय करार करणे बंधनकारक आहे. सदरच्या त्रिपक्षीय करारामध्ये नमूद केलेल्या सर्व अटी शर्ती या करारातील तीनही पक्षांना बंधनकारक असतील व त्याचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

तसेच शासनाने वरील संदर्भाधीन शासन निर्णयामध्ये नमूद केलेले विविध अटी व शर्ती यांचे देखील अचूकपणे पालन करणे आवश्यक आहे.

सदरचे आदेश निर्गमित झाल्यानंतर ४५ दिवसांच्या आत वरील निवडसूचीतील ट्रेनिंग प्रोव्हायडरनी शैक्षणिक संस्थांची संबंधित संस्था प्रमुखांच्या सहमतीने निवड करणे बंधनकारक आहे. परंतु जर काही शैक्षणिक संस्थांमध्ये वरीलपैकी कोणताही ट्रेनिंग प्रोव्हायडर सदर अभ्यासक्रम राबविण्यास इच्छुक नसेल तर वरील ट्रेनिंग प्रोव्हायडर्समध्ये योग्य विभागणी करून अशा संस्थांमध्ये हा

अभ्यासक्रम राबविण्यासाठी शासनातर्फे ट्रेनिंग प्रोव्हायडर्स नेमून देण्यात येतील व अशा तऱ्हेने वाटप केलेल्या संस्थांमध्ये हा शैक्षणिक अभ्यासक्रम राबविणे ट्रेनिंग प्रोव्हायडरला बंधनकारक असेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्र. ह. क्षीरसागर )
शासनाचे सहसचिव.

प्रति,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.उपमुख्यमंत्र्याचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
कुलगुरू, सर्व विद्यापीठे,
संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, उद्योगधंदे संस्था समन्वय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
शिक्षण संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, व्यवसाय शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
कला संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, वांद्रे (पू.), मुंबई.
सर्व सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालये.
सर्व सहसंचालक, उच्च शिक्षण, विभागीय कार्यालये.
सर्व उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, विभागीय कार्यालये.
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
सर्व प्राचार्य शासकीय महाविद्यालये/तंत्रनिकेतने/औद्योगिक प्रशिक्षण संस्था (संबंधित संचालकांमार्फत)
प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव(लेखा व कोषागार), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव(व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, वैद्यकीय शिक्षण, मंत्रालय, मुंबई.
सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, पशुसंवर्धन, दुग्धविकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई.

विकास आयुक्त, उद्योग संचालनालय,
उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव.
मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव.
मा.प्रधान सचिव (उच्च व तंत्रशिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक.
मा.प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व कार्यासने.
निवड धारिका/तांशि-३

**महाराष्ट्र राज्य माहिती तंत्रज्ञान प्रमाणपत्र अभ्यासक्रम कार्यक्रमांतर्गत शैक्षणिक संस्थांना प्राप्त होणाऱ्या उत्पनाचा विनियोग करण्याबाबत**

महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्रशिक्षण विभाग

शासन निर्णय क्र.मातंत्र ३७००/(१३२/२०००)/भाग-इ/तांशि-३

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.

दिनांक : ६ डिसेंबर,२००१.

संदर्भ:-१) या विभागाचा शासन निर्णय क्र.मातंत्र ३७००/(१३२/२०००)/तांशि-३, दि.३.१०.२००० व १३.१०.२०००

२)शासन निर्णय क्र.मातंत्र ३७००/(१३२/२०००)/भाग-इ/तांशि-३ दि.२५.६.२००१

**प्रस्तावना:-**

शासनाने राज्यातील उच्च व तंत्रशिक्षण विभागांतर्गत येणारी विविध महाविद्यालये, तंत्रनिकेतने व औद्योगिक प्रशिक्षण संस्था मध्ये नेटवर्क ॲक्सेस सेंटर (N.A.C.)ची स्थापना करून त्याद्वारे संस्थेतील विद्यार्थी व शिक्षकांकरिता महाराष्ट्र राज्य माहिती तंत्रज्ञान प्रमाणपत्र अभ्यासक्रम (M.S.C.I.T. व M.S.A.C.I.T.) वरील संदर्भाधीन सुरू करण्याचे आदेश निर्गमित केले आहेत.

सदर कार्यक्रमांतर्गत या अभ्यासक्रमाकरिता ट्रेनिंग प्रोव्हायडरद्वारे संस्थेतील विद्यार्थ्यी व शिक्षकांकडून शासनाने विहित केलेल्या शुल्काप्रमाणे आकारण्यात येणाऱ्या एकूण शुल्कापैकी २०% व १०% इतकी रक्कम संबंधित शैक्षणिक संस्थेस व संबंधित संचालनालयात अदा करण्याबाबतची तरतुद संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयात केली आहे. तसेच त्या शासन निर्णयान्वये अशा प्रकारे संस्थेस प्राप्त होणाऱ्या रकमेचा विनियोग हा सदर अभ्यासक्रम राबविण्यासाठी (वीज, दूरध्वनी, इंटरनेट पाणी-पुरवठा, सुरक्षा इ.बाबत होणारा आवर्ती खर्च) व तसेच महाविद्यालयाच्या विकास कार्यासाठी करण्यासाठीचे अधिकार संबंधित शैक्षणिक संस्थांच्या प्राचार्यांना दिले आहेत.

तथापि, सदरचा कार्यक्रम हा प्रामुख्याने खाजगी ट्रेनिंग प्रोव्हायडर मार्फत राबविला जात असून त्रिपक्षीय करारातील तरतुदीनुसार सध्याच्या Network Access Center (NAC) मध्ये पुरविण्यात आलेल्या विविध संगणकीय सुविधा ट्रेनिंग प्रोव्हायडने पुरविल्या असून विहित मुदतीअंती करार संपुष्टात आल्यानंतर देखील प्रत्येक शासकीय शैक्षणिक संस्थेमध्ये संस्थेच्या मालकीची स्वतंत्र कायम स्वरूपी NAC ची यंत्रणा प्रस्थापित करण्याच्या दृष्टीने उपाययोजना करण्याबाबत आदेश निर्गमित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या

विचाराधीन होता. जेणे करून भविष्यात संस्थेतील NAC च्या माध्यमातून विद्यार्थी व शिक्षकांना माहिती तंत्रज्ञानाच्या सहाय्याने माहिती तंत्रज्ञान व इतर पारंपारिक अभ्यासक्रम शिकविण्यासाठी सहाय्यभूत ठरू शकेल. त्याच बरोबर NAC चा सामान्य जनांसाठी बहुउद्देशीय Hitech Resourse Center म्हणून देखील उपयोग होऊ शकेल.

## शासन निर्णय:-

या अनुषंगाने शासन आता खालीलप्रमाणे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत---वरील संदर्भ क्र.१ अन्वये शासनाने सुरू केलेल्या कार्यक्रमांतर्गत शासकीय शैक्षणिक संस्थेस मिळणाऱ्या २०% रकमेचा विनियोग हा या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी येणारा विविध खर्च भागविण्यासाठी व **त्याच बरोबर प्रत्येक शासकीय शैक्षणिक संस्थेमध्ये संस्थेच्या मालकीची स्वतंत्र कायम स्वरूपी NAC ची यंत्रणा प्रस्थापित करून त्याद्वारे संस्थेचा विकास करण्यासाठीच** करण्यात यावा. अशा प्रकारे NAC ची यंत्रणा प्रस्थापित करण्यासाठी संगणक व तदनुषंगिक यंत्रसामुग्रीची खरेदीची कार्यवाही शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र. सीओएम२०००/ प्र.क्र.४७/२००१/३९, दि.२२.१०.२००१ आणि शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग क्र.भांखसं १०८८/ (२५१२)/उ-६, दि.२ जानेवारी,१९९२ व त्यानंतर वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वे व तरतुदींप्रमाणे करावी.

सदर आदेशाची अंमलबजावणी अत्यंत काटेकोरपणे करणे आवश्यक आहे व याची सर्वस्वी जबाबदारी सबंधित संचालक व संस्थेच्या प्राचार्यांची राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्र. ह. क्षीरसागर )
शासनाचे सहसचिव.

प्रति,

संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, उद्योगधंदे संस्था समन्वय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
शिक्षण संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, व्यवसाय शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
कला संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, वांद्रे (पू.), मुंबई.
सर्व सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालये.
सर्व सहसंचालक, उच्च शिक्षण, विभागीय कार्यालये.

सर्व उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, विभागीय कार्यालये.
प्राचार्य, सर्व शासकीय महाविद्यालये (संचालक, उच्च शिक्षणा यांचेमार्फत)
प्राचार्य, सर्व शासकीय अभियांत्रिकी, औषधनिर्माणशास्त्र, वास्तुशास्त्र महाविद्यालये व तंत्रनिकेतने (संचालक, तंत्रशिक्षणा यांचेमार्फत)
प्राचार्य, सर्व शासकीय कला महाविद्यालये (संचालक, कला यांचेमार्फत)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव(लेखा व कोषागार), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव(व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, माहिती तंत्रज्ञान (सामान्य प्रशासन विभाग),
सचिव, वैद्यकीय शिक्षण, मंत्रालय, मुंबई.
सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, पशुसंवर्धन, दुग्धविकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग
विकास आयुक्त, उद्योग संचालनालय,
सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी (पत्राद्वारे)
उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव.
उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व कार्यासने.
मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव.
मा.प्रधान सचिव (उच्च व तंत्रशिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक.
सर्व ट्रेनिंग प्रोव्हायडर्स
निवडधारिका/तांशि-३.

**शैक्षणिक संस्थांमध्ये सुरू केलेला महाराष्ट्र राज्य माहिती तंत्रज्ञान प्रमाणपत्र अभ्यासक्रम कार्यक्रम महाराष्ट्र ज्ञान महामंडळ, मर्यादित यांच्याकडे हस्तांतरीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.मातंत्र ३७००/(२२३/२०००)/तांशि-३**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.**
**दिनांक : ६ फेब्रुवारी, २००२.**

संदर्भ:-१) शासन निर्णय क्र.मातंत्र ३७००/(१३२/२०००)/तांशि-३, दि.३.१०.२००० व १३.१०.२०००
२) शासन निर्णय क्र.मातंत्र ३७००/(१३२/२०००)/भाग-इ/तांशि-३, दि.२५.६.२००१
३) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.मातंत्र ३७००/(१३२/२०००)/भाग-ड /तांशि-३, दि.६ जून, २००१.
४) शासन निर्णय समक्रमांक, दि.२३.१.२००२

**शासन निर्णय:-**

शासनाने वरील संदर्भ क्र.१ अन्वये राज्यातील उच्च व तंत्रशिक्षण विभागांतर्गत येणारी विविध महाविद्यालये, तंत्रनिकेतने व औद्योगिक प्रशिक्षण संस्था मध्ये खाजगी/अभिमत दर्जा प्राप्त ट्रेनिंग प्रोव्हायडरमार्फत नेटवर्क ॲक्सेस सेंटर (N.A.C.)ची स्थापना करून त्याद्वारे संस्थेतील विद्यार्थी व शिक्षकांकरिता महाराष्ट्र राज्य माहिती तंत्रज्ञान प्रमाणपत्र अभ्यासक्रम (M.S.C.I.T. व M.S.A.C.I.T.) वरील सुरू करण्याचे आदेश निर्गमित केले आहेत. या कार्यक्रमाची रितसरपणे अंमलबजावणी करण्याच्या उद्दिष्टाने संबंधित शैक्षणिक संस्था, संचालनालय व ट्रेनिंग प्रोव्हायडर यांच्या दरम्यान त्रिपक्षीय करार देखील करण्यात आलेला आहे.

सदर त्रिपक्षीय करारातील General Clauses मधील अ.क्र.७ मध्ये नमूद केल्याप्रमाणे शासनाने वरील संदर्भ क्र.३ अन्वये महाराष्ट्र ज्ञान महामंडळ मर्यादित ची स्थापना केली आहे. यामुळे त्रिपक्षीय करारातील वरील तरतुदीनुसार सदर कार्यक्रम महाराष्ट्र ज्ञान महामंडळ मर्यादित, मुंबई यांच्याकडे या आदेशान्वये दि.१.४.२००२ पासून हस्तांतरीत करण्यात येत आहे. तथापि, वरील संदर्भ क्र.४ अन्वये या

कार्यक्रमांतर्गत शैक्षणिक संस्थेस वेळोवेळी प्राप्त होणाऱ्या रकमेच्या विनियोगाबाबतचे आदेश अबाधित राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्र. ह. क्षीरसागर )
शासनाचे सहसचिव.

प्रति,

- ❖ व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र ज्ञान महामंडळ मर्यादित, १ला मजला, व्यवसाय शिक्षण संचालनालय, इमारत, ३ महापालिका मार्ग, एलफिन्स्टन टेक्नीकल हायस्कूल परिसर, मुंबई-१.
- ❖ संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
- ❖ संचालक, उद्योगधंदे संस्था समन्वय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
- ❖ शिक्षण संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
- ❖ संचालक, व्यवसाय शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
- ❖ संचालक, प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
- ❖ कला संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
- ❖ ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
- ❖ अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, वांद्रे (पू.), मुंबई.
- ❖ सर्व सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालये.
- ❖ सर्व सहसंचालक, उच्च शिक्षण, विभागीय कार्यालये.
- ❖ सर्व उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, विभागीय कार्यालये.
- ❖ प्राचार्य, सर्व शासकीय महाविद्यालये (संचालक, उच्च शिक्षण यांचेमार्फत)
- ❖ प्राचार्य, सर्व शासकीय अभियांत्रिकी, औषधनिर्माणशास्त्र, वास्तुशास्त्र महाविद्यालये व तंत्रनिकेतने (संचालक, तंत्रशिक्षणा यांचेमार्फत)
- ❖ प्राचार्य, सर्व शासकीय कला महाविद्यालये (संचालक, कला यांचेमार्फत)
- ❖ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
- ❖ महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
- ❖ प्रधान सचिव(लेखा व कोषागार), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
- ❖ प्रधान सचिव(व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
- ❖ प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- ❖ प्रधान सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
- ❖ सचिव, माहिती तंत्रज्ञान (सामान्य प्रशासन विभाग),
- ❖ सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
- ❖ संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग
- ❖ विकास आयुक्त, उद्योग संचालनालय,
- ❖ उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव.

- उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व कार्यासने.
- मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव.
- मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव.
- मा.प्रधान सचिव (उच्च व तंत्रशिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक.
- सर्व ट्रेनिंग प्रोव्हायडर्स